20040812123036001-1700

१ जानेवारी, १९९५ पर्यन्त अस्तित्वात असलेल्या झोपडपट्टीतील झोपडीधारकांना ओळखपत्र (फोटोपास) देण्याबाबत शासनाचे सुधारित धोरण.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
शासन शुध्दीपत्रक क्र.गवसु १२२०/प्र.क्र.३६४/झोपसु-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १८ सप्टेंबर, २००२.**

वाचा : गृनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक गवसु १२२०/प्र.क्र.२०४(१) /झोपसु-१, दि.११ जुले, २००१.

शासन निर्णय क्रमांक गवसु १२२०/प्र.क्र.२०४(१) /झोपसु-१, दि.११ जुले, २००१ मधील परिच्छेद ६ (ब) व ६(क) मध्ये नमूद मजकूर रद्द समजण्यात यावा व त्याऐवजी खालील सुधारित परिच्छेद वाचावा.

**६(ब) "पात्र झोपडपट्टीवासियांना ओळखपत्र देतांना दरमहा सेवाशुल्क, प्रशासकिय आकार व भुईभाडे आकारतांना खालील्प्रमाणे कार्यवाही करावी :-**

१. दि.३१.७.२००२ पर्यन्त सर्व प्रकारच्या शुल्काची थकबाकी ही कितीही वर्षांची असो ती जुन्या दराने वसूल करण्यात यावी.

२. दि.१.८.२००२ पासून एकत्रित शुल्काची वसूली खालीलप्रमाणे करण्यात यावी.

या एकत्रित शुल्कातील विविध बाबींची टक्केवारी खालीलप्रमाणे राहील.

अ) सेवाशुल्क ४० टक्के
ब) प्रशासकिय आकार २० टक्के
क) भुईभाडे ४० टक्के

**बृहन्मुंबई महानगरपालिका हद्दीतील क्षेत्रासाठी एकत्रित शुल्क :-**

| ओळखपत्रचा आकार | क्षेत्र | नुकसान भरपाई (एकत्रित) दरमहा | शेरा |
|---|---|---|---|
| निवासी | २२५चौ.फू पर्यन्त | रुपये १००/- | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये १/- प्रति चौ.फू.दरमहा |
| सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक | -- | दरमहा रुपये ०.५० प्रति चौ.फू. | |
| संयुक्त | २२५ चौ. फू.पर्यन्त | रुपये २००/- | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये १.५०/- प्रति चौ.फू.दरमहा |
| अनिवासी | २२५ चौ फ पर्यन्त | रुपये ३००/- | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये २/- प्रति चौ फ दरमहा |

टिप :- वरील विवरणपत्रात नमूद केलेले क्षेत्र म्हणजे झोपडीधारकांच्या वापरात असलेले क्षेत्र यामध्ये मजला किंवा पोटमाळा याचा समावेश नाही. ओळखपत्र देतांना पात्र झोपडपट्टीधारकाला त्याच्या वापरातील क्षेत्रापुरताच फोटोपास देण्यात येणार आहे. पोटमाळा, मजला / माळा यासाठी स्वतंत्र ओळखपत्र देण्यात येणार नाही.

३. राज्यातील शहरामधील सुधारित दराने दि.१.८.२००२ पासून वसूल करावयाच्या एकत्रित शुल्कामध्ये एकरुपता व समानता राहण्याच्या दृष्टिने पात्र झोपडपट्टीवासियांकडून वसूल करावयाच्या सुधारित एकत्रित शुल्कामध्ये असलेल्या बाबीमध्ये कोणत्याही प्रकारची दरवाढ अथवा दर कमी करण्यात येऊ नये."

६(क) "दि.१.८.२००२ पासून बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रा व्यतिरिक्त अन्य महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रातील वसूल करावयाच्या एकत्रित शुल्काचा दर परिच्छेद ६(ब) २ मध्ये नमूद केल्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या क्षेत्रासाठीच्या दराच्या २५ टक्के एवढा राहील."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(ल. दा. व्यास)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिवांचे खाजगी सचिव.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता)लेखापरीक्षा
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता)लेखापरीक्षा
९) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व)मुंबई
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ५ वा मजला, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
१४) सर्व विभागीय महसुल आयुक्त.
१५) सर्व महानगरपालिका आयुक्त/प्रशासक (१८ महानगरपालिका)